सन २०१८-१९ च्या टंचाई अंतर्गत मौजे ढाकेफळ व ५ गावे, तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद येथील तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०१८/प्र.क्र. २१३/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १६ सप्टेंबर, २०२०

वाचा -

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/पापु १४, दिनांक ४.५.२०१६
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक जा.क्र. २०१८/ मशाका/नैआ-२/कावि-२५६६, दिनांक १९.०७.२०२० चे पत्र.
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, टंचाई २०१८/प्र.क्र. २१३/पापु-१४ दि.१५.१२.२०१८

प्रस्तावना -

सन २०१८-१९ च्या टंचाई कालावधीसाठी टंचाई उपाययोजने अंतर्गत मौजे ढाकेफळ व ५ गावे, तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद या योजनेच्या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा रुपये ९०,२५,०००/- किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तथापि प्रत्यक्ष काम करताना कच्चा खडक व कठीण खडकामध्ये खोदकाम करण्यात आले आहे. या योजनेकरिता जायकवाडी जलाशय प्रकल्प उद्भव धरुन योजना आखण्यात आली होती. तथापि, सदरचा चर पाटबंधारे खात्याने बुजवून टाकला व त्यामुळे उन्हाळयामध्ये जलाशयातील पाणी (बॅक वॉटर) अंदाजे १ कि. मी. मागे लांब गेल्याने खर्चात वाढ झाली आहे. पंपिंग मशिनरी स्टार्टरमध्ये बदल झाला आहे. त्यामुळे मूळ मंजूर योजनेच्या किंमतीत रु. ९.७१ लक्ष इतकी वाढ होत आहे. त्यामुळे विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी

संदर्भ क्रमांक-०३ येथील पत्रान्वये रु. ९९,९६,०००/- इतक्या ढोंबळ किंमतीचे अंदाजपत्रक सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मौजे ढाकेफळ व ५ गावे, तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद या योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन मौजे ढाकेफळ व ५ गावे, तालुका पैठण, जिल्हा औरंगाबाद या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा रुपये ९९,९६,०००/- (अक्षरी रुपये नव्याण्णव लाख, शहाण्णव हजार फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून टंचाई अंतर्गत सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरीच्या व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

२) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

**२. याकरिता होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१)(०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१, सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा.**

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१६११४६३०९३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.09.16 12:12:19 +05'30'

**(गणेश पवार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (म. व पु.), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
८. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
९. जिल्हाधिकारी, औरंगाबाद
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद
११. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद
१२. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१३. सह सचिव (पापु १४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१४. पापु १४ (निवडनस्ती)